**आदिवासी विकास विभागाच्या शासकीय वसतीगृहांमधील प्रभारी गृहपाल यांना आहारण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आवगृ-२०१८/प्र.क्र.३२१/का.१२**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०९ जानेवारी, २०१९.

<u>वाचा</u> :- १) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय, क्र.आवगृ-१२००/प्र.क्र.५०/का-१२, दि.२८.०६.२००२.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय, क्र. शावगृ-२००६/प्र.क्र.६५/का-१२, दि.०६.१२.२००७.

**<u>प्रस्तावना:-</u>**

अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना उच्च शिक्षण घेणे सुलभ व्हावे याकरिता विभागामार्फत शासकीय वसतीगृहे चालविण्यात येतात. आदिवासी विकास विभागांतर्गत एकूण ४९५ शासकीय वसतीगृहे मंजूर त्यापैकी सद्यस्थितित ४९१ वसतीगृहे कार्यरत आहेत. सदर वसतीगृहांमध्ये दरवर्षी सुमारे ५६,००० अनुसूचित जमातीचे विद्यार्थी शिक्षण घेत असतात. सदर शासकीय वसतीगृहातील कर्मचाऱ्यांचे वेतन व देयके, प्रवास भत्ता, भविष्यनिर्वाह निधी अग्रीम, उधारी देयके व इतर सर्व प्रकारची देयके पारीत करण्यासाठी गृहपालांना उपरोक्त वाचा येथील रोजीच्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आले आहे. परंतु, काही वसतीगृहांमध्ये काही कारणांस्तव गृहपाल पद रिक्त असल्यास अशा ठिकाणी प्रभारी गृहपाल म्हणून अतिरिक्त कारभार सोपविण्यात येतो. तथापि, प्रभारी गृहपाल यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित केले नसल्यामुळे अशा वेळी कर्मचाऱ्यांची वेतना संबंधीत देयके व इतर बाबींसाठीची देयके कोषागार शाखेकडे पाठविण्यासाठी अडचण निर्माण होते त्यामुळे प्रभारी गृहपाल यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

(१) आदिवासी विकास विभागांतर्गत असलेल्या शासकीय वसतीगृहातील गृहपाल हे पद रिक्त असल्यास सदर पदावर प्रभारी गृहपाल म्हणून लेखी आदेशान्वये प्रकल्प अधिकारी यांचे स्वाक्षरीने अतिरिक्त कार्यभार सोपविला असल्यास अशा वेळी प्रभारी गृहपालांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

(२) सदर शासन निर्णय संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी त्यांच्या अंतर्गत असलेल्या शासकीय वसतीगृहाच्या गृहपालांच्या निदर्शसनास आणून त्याप्रमाणे पुढील योग्य ती कार्यवाही करण्याच्या सूचना द्याव्यात.

(३) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११०१२०५५९९८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2019.01.10 12:16:05 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
४. सर्व मा. मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
६. सर्व मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
७. सर्व मा. विधानसभा सदस्य.
८. सर्व मा. विधानपरिषद सदस्य.
९. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
१०. मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
११. मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१४. सर्व जिल्हाधिकारी.
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१८. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१९. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२१. सर्व गृहपाल, शासकीय वसतीगृहे. (प्रकल्प अधिकारी यांच्या मार्फत)
२२. निवड नस्ती कार्यासन १२.